महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहाय्यक पोलिस उपनिरीक्षक/पोलिस हवालदार/पोलिस नाईक व पोलिस शिपाईयांच्याकरिता पोलिस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२००२

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-पीएसबी ३२००१/प्र.क्र.४१५/पोल-५अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २४ फेब्रुवारी २००३

<u>शासन परिपत्रक</u>:- महाराष्ट्र राज्य पोलिस दलातील पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा-परीक्षा महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दिनांक **२९ जून, २००३** रोजी मुंबईसह आठ परीक्षा केंद्रांवर घेण्यात येणार आहे. परीक्षेचा कार्यक्रम, आरक्षित केलेल्या पदाचा तपशिल, अर्ज करण्याची पध्दत याबाबतचा सविस्तर कार्यक्रम व निवडपध्दतीचा तपशील सोबत जोडलेल्या **परिशिष्ट ''अ''** मध्ये नमूद केला आहे. तरी हे परिपत्रक सहाय्यक पोलिस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलिस नाईक व पोलिस शिपाई या संवर्गातील सर्व कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शि. शं.धुमाळे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन , गृह विभाग.

प्रति,
१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, मुंबई.
५) अपर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), पुणे.
६) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग मुंबई.
७) अपर पोलीस महासंचालक , (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
९) सर्व परिक्षेत्रीय पोलीस महानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधीक्षक.
११) सर्व पोलीस आयुक्त, (मुंबई वगळून).

शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक-पीएसबी ३२००१/प्र.क्र.४१५/पोल ५ अ,दि.२४/२/२००३

सोबतचे **परिशिष्ट "अ"**

महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहाय्यक पोलीस उप-निरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई, यांच्या करिता पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा-परीक्षा महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्याचा निर्णय, शासन निर्णय, क्रमांक-पीएसबी-०३९०/सीआर-४०८/(२)/पोल-५अ, दिनांक ८ फेब्रुवारी, १९९६ अन्वये लागू करण्यात आला. त्यानुसार खाली नमूद पदांवर नियुक्तीकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत रविवार, दिनांक **२९ जून, २००३** रोजी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा घेण्यात येईल.

२. रिक्त जागा ३०० असून आरक्षणनिहाय रिक्त पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अमागास Non-BC (१) | अ.जा. SC (२) | अ.ज. ST (३) | वि.जा.(अ) DT (A) (४) | भ.ज. (ब) NT (B) (५) | वि.मा.प्र. SBC (६) | भ.ज.(क) धनगर व तत्सम Dhangar Etc. NT (C) (७) | भ.ज. (ड) वंजारी व तत्सम Wanjari Etc. NT (D) (८) | इ.मा.व. OB.C. (९) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २०६ | ३७ | २० | ७ | १०. | ६ | ८ | ६ | — |

टीप-१) वर नमूद केलेल्या पदसंख्येत व आरक्षणामध्ये शासनाच्या सूचनेनुसार काही प्रमाणात किरकोळ बदल होण्याची शक्यता आहे. सदर बदल आवश्यकतेनुसार मुलाखतीच्या वेळी संबंधित उमेदवारांच्या निदर्शनास आणण्यात येईल.

२) उपरोक्त पदसंख्या ही सदर परीक्षेमधून भरण्यात येणारी अंतिम पदसंख्या राहील. त्यामध्ये मागावून कोणत्याही प्रकारची वाढ होणार नाही व या संदर्भातील आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

**३. पात्रता विषयक अटी :-**

**(अ) शैक्षणिक अर्हतेसह अनुभव :-**

प्रस्तुत परीक्षेकरिता उमेदवारांचा सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक/पोलीस हवालदार/पोलीस नाईक व पोलीस शिपाई या पदावर नियमित नियुक्तीच्या दिनांकापासून दिनांक **१ जानेवारी, २००३** पर्यंत खालीलप्रमाणे किमान नियमित सेवा पूर्ण होणे आवश्यक आहे.

१) मान्यता प्राप्त विद्यापीठाच्या कोणत्याही शाखेचा पदवीधर असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत- ४ वर्षे

२) महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची एच.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण किंवा महाराष्ट्र शासनाने एच.एस.सी. च्या समतूल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत- ५ वर्षे

३) एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण किंवा महाराष्ट्र शासनाने एस.एस.सी. च्या समतूल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत -६ वर्षे

**(ब) वयोमर्यादा :-**

उमेदवाराचे वय दिनांक **१ जानेवारी, २००३** रोजी गणले जाईल आणि वयोमर्यादा अमागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत ३५ वर्षापर्यंत व मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत ४० वर्षापर्यंत राहील.

टीपः-

जे उमेदवार मर्यादित विभागीय परीक्षेस बसण्यास दिनांक- १ जानेवारी १९९१ रोजी पात्र होते. तथापि, उक्त परीक्षा १ जानेवारी, १९९१ पासून घेण्यात न आल्यामुळे उक्त परीक्षेस बसू शकले नाहीत आणि म्हणून वयोमर्यादेमुळे त्यांची संधी हुकली आहे. अशा उमेदवारांना सन १९९७ पासून पुढे घेण्यात येणा-या तीन सलग परीक्षांना बसण्याच्या ३ संधी देण्यात आल्या आहेत. मात्र जे उमेदवार सन १९९८ मध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने घेतलेल्या परीक्षेस बसले नाहीत अशा उमेदवारांच्या बाबतीत त्यांनी ती संधी गमावली असे समजण्यात येवून त्यांना आता केवळ दोन संधी उपलब्ध होतील. तसेच जे उमेदवार परीक्षेस बसले होते, त्यांनाही आता केवळ दोन संधी उपलब्ध होतील.

४. पोलीस महासंचालक यांचे कार्यालय तसेच पोलीस खात्याची विभागीय कार्यालये व त्यांचे प्रमुख आणि संबंधित कर्मचारी यांना मार्गदर्शनासाठी व कार्यवाहीसाठी सूचना देण्यात येत आहेत की, सर्व संबंधित पोलीस कर्मचा-यांनी स्वतःची शैक्षणिक अर्हता, कमाल वयोमर्यादा, जात, जमात व निवास इ. बाबतच्या नोंदी मूळ कागदपत्राबरोबर पडताळून मगच अर्जात नमूद कराव्यात. संबंधित कार्यालय प्रमुख/आस्थापना अधिकारी यांनी कर्मचा-यांनी अर्जात नमूद केलेल्या नोंदी बरोबर आहेत हे तपासून, त्याचप्रमाणे संबंधित कर्मचा-यांचा गोपनीय अभिलेख पाहून तो समाधानकारक असल्याचे प्रमाणित करणे आवश्यक आहे.

५. सदर परीक्षेच्या अर्जाचा नमुना, अभ्यासक्रमाच्या प्रती **"विक्रीकर भवन, ९ वा मजला, सरदार बलवंतसिंग दोधी मार्ग, माझगांव, मुंबई- ४०००१०"** येथील आयोगाच्या कार्यालयात सकाळी १०-०० ते सायंकाळी ५.०० च्या दरम्यान रु. २०/- रोख भरुन मिळू शकेल अथवा पत्राने विनंती अर्जासह स्वतःचा पत्ता लिहिलेला व रु. १०/- ची

पोस्टाची तिकीटे लावलेला मोठा लिफाफा (२८ सें.मी. X १३ सें.मी.) आणि रुपये २०/- चा कोर्ट फी स्टॅम्प चिकटवून सदर परीक्षेचा स्पष्ट उल्लेख करुन दिनांक **१७ मार्च, २००३** पर्यंत **''उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, विक्रीकर भवन , ९वा मजला, सरदार बलवंतसिंग ढोंढी मार्ग, माझगांव मुंबई-४०० ०१०''** यांच्या नावे पाठविल्यास अर्ज मिळू शकेल. सदर पत्र असलेल्या लिफाफ्यावर **''पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२००२ साठी अर्जाची मागणी करणारे पत्र''** असे ठळक अक्षरात लिहावे. टपालाने अर्जाची मागणी करताना वरील बाबींची पूर्तता झाली नसल्यास अर्ज पुरविला जाणार नाही व त्या संबंधीच्या पत्रास उत्तर दिले जाणार नाही. टपाल खात्याची दिरंगाई वा अन्य कोणतेही कारण विचारात न घेता कोणत्याही परिस्थितीत अर्ज पुरविण्याची कालमर्यादा दिनांक **१७ मार्च, २००३** पर्यंत राहील व ती काटेकोरपणे पाळली जाईल, आणि त्याकरिता अर्ज मागविणे व तो भरुन पाठविणे या दोन्ही क्रिया उमेदवारांनी अत्यंत तत्परतेने पार पाडणे त्यांच्या हिताचे राहील. सदर परीक्षेसाठी <u>आयोगाकडून पुरविण्यात आलेले विहित नमुन्यातील अर्जच</u> विचारात घेण्यात येतील. अर्जाच्या झेरॉक्स प्रती किंवा साध्या कागदावरील अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

**६. (अ) <u>अर्ज सादर करण्याचा कार्यक्रम खालीलप्रमाणे राहील.</u>**

| | |
|---|---|
| १. आयोगाने अर्जाचा नमुना उमेदवारांना पुरविण्याची तारीख :- | २५ फेब्रुवारी२००३ ते १७ मार्च, २००३ |
| २. उमेदवाराने कार्यालय/विभाग प्रमुख यांचेकडे अर्ज सादर करण्याची अंतिम तारीख :- | ३१ मार्च, २००३ |
| ३. कार्यालय/विभाग प्रमुखांनी सदर शासन परिपत्रकातील अर्हता आणि परीक्षेच्या इतर अटी / शर्ती नुसार उमेदवारांच्या अर्जाची छाननी करुन जे उमेदवार त्या अटी पूर्ण करतात त्या उमेदवारांच्या अर्जावर तसे प्रमाणपत्र प्रमाणित करुन असे सर्व अर्ज पोलीस महासंचालक, मुंबई कार्यालयास सादर करण्याची अंतिम तारीख :- | १० एप्रिल, २००३ |
| ४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी आवेदनपत्रे एकत्रित करुन ती शासनाकडे पाठविण्याची अंतिम तारीख :- | ११ एप्रिल, २००३ |
| ५. शासनाने आयोगाकडे अर्ज पाठविण्याची अंतिम तारीख :- | २८ एप्रिल, २००३ |
| ६. परीक्षेची तारीख :- | २९ जून, २००३. |

**(ब) <u>महत्वाच्या सुचना :-</u>**

१) **दिनांक २८ एप्रिल, २००३** नंतर आयोगाकडे आलेले अर्ज कोणत्याही परिस्थितीत स्वीकारले जाणार नाहीत.

२) उमेदवारांनी त्यांचे अर्ज पूर्णपणे भरणे, त्यावर विहित जागी स्वतःचे अलिकडील काळात काढलेले ३ X ५ सें.मी. आकाराचे छायाचित्र घट्ट चिकटविणे, अर्जातील सेवेसंदर्भातील

प्रमाणपत्र प्रमाणित करुन घेणे ही सर्वस्वी उमेदवारांची जबाबदारी असून या बाबींची पूर्तता न झाल्यास त्यांचे अर्ज नाकारले जातील. परिपूर्ण अर्ज कार्यालयप्रमुखामार्फत वर नमूद केलेल्या कार्यक्रमानुसार व परिच्छेद-७ मध्ये नमूद केलेल्या पध्दतीप्रमाणे आयोगाकडे सादर करावे.

३) आवेदनपत्रांचे संगणकावर संस्करण केले जात असल्यामुळे चुकीचे भरलेले अर्ज आपोआप नाकारले जातील. यास्तव, उमेदवारांनी अर्ज भरताना अर्जातील नोंदी काळजीपूर्वक वाचून भराव्यात. तसेच, अर्जामध्ये नोंदी करण्यापूर्वी त्याकरिता दिलेल्या सूचना काळजीपूर्वक वाचून त्याचे अनुपालन करावे. संगणकाच्या प्रक्रियेकरिता पत्ता लिहिण्यास मर्यादित जागा सोडली असल्याने पत्ता थोडक्यात लिहून सर्वसाधारणपणे Rd., Tal., Dist., Corpn. इ. संक्षिप्त रुपे वापरावीत. आवेदनपत्र सादर केल्यानंतर पत्त्यातील बदलाची दखल घेतली जाणार नाही. **अर्जाचे संगणक संस्करण स्कॅनरवर होणार असल्याने अर्जाचा नमुना कोणत्याही प्रकारे खराब होणार नाही वा चुरगळणार नाही याची सर्वतोपरी काळजी घ्यावी. तसेच अर्जास टॅग किंवा टाचण्याही लावू नयेत.**

४) परीक्षांसाठी एकदा निवडण्यात आलेले परीक्षा केंद्र, तसेच जातीचा वर्गवारी विषयक दावा, अथवा आवेदनपत्रातील अन्य तपशील यामध्ये मागाहून कोणत्याही कारणास्तव बदल करता येणार नाही, म्हणून उमेदवारांनी आयोगास आवेदनपत्र सादर करताना आपल्या निवडीचे परीक्षा केंद्र, जातीची वर्गवारी व अन्य तपशील अचूक दर्शविला आहे, याची खात्री करुन घ्यावी. परीक्षेचा अर्ज करताना जातीचे प्रमाणपत्र उपलब्ध नसल्याची सबब सांगून उमेदवाराने अमागास अथवा इतर कोणतीही वर्गवारी नमूद न करता आपली जी वर्गवारी आहे, तीच वर्गवारी नमूद करणे आवश्यक आहे. तसेच मुलाखतीच्यावेळी त्या पुष्ठयर्थ आवश्यक त्या प्रमाणपत्राची प्रत जोडणे आवश्यक आहे.

**७.** १) कार्यालय प्रमुखांनी अर्ज पोलीस महासंचालकांकडे पाठविण्यापूर्वी अर्जदाराने अर्जात नमूद केलेल्या सेवा, शिक्षण, जन्मतारीख, वय, जात, निवासस्थान , विभागीय चौकशी, आगाऊ वेतनवाढ, संगणक प्रशिक्षण इ. नोंदी मूळ कागदपत्रांबरोबर पडताळून आणि संबंधित कर्मचा-यांचे गोपनीय अभिलेख समाधानकारक असल्याची खात्री करुन अर्जावरील प्रमाणपत्रामध्ये त्याच्या नोंदी घेऊन स्वाक्षरीत करावे. अपात्र असणा-या उमेदवाराचे अर्ज आयोगाकडे पाठविण्यात येवू नयेत. पोलीस विभागातील परीक्षेसाठी अर्हताप्राप्त असणा-या उमेदवारांचे अर्ज एकत्रित करुन शासनाच्या गृह विभागाच्या पत्रासोबत आयोगाकडे **दिनांक २८ एप्रिल, २००३** पर्यंत पाठविण्यात यावे. पत्रासोबत उमेदवारांच्या नावांची यादी जोडावी. उमेदवारांची मूळ कागदपत्रे त्यांना परत करावीत. ती अर्जासोबत आयोगाकडे पाठवू नयेत. **दिनांक २८ एप्रिल, २००३** नंतर आयोगाकडे आलेले अर्ज स्वीकारले जाणार नाहीत. तसेच या संदर्भातील अभिवेदने/विनंती यांचा विचार केला जाणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी. **उपरोक्त परिच्छेद ६ (अ) मधील कार्यवाही करताना अर्जाचे नमुने कोणत्याही प्रकारे खराब होणार नाहीत, फाटणार वा चुरगळले जाणार नाहीत तसेच एकत्र पाठविताना त्याला टॅग/ टाचण्या / स्टेपल पिना वापरु नयेत.**

२) प्रस्तुत शासन परिपत्रकातील सूचनेनुसार फलकावर विक्रीस ठेवलेला विहित अर्जाचा नमुनाच उमेदवाराने भरुन पाठवावा. टंकलिखित/हस्तलिखित अर्जाचा नमूना भरुन पाठविलेला आढळल्यास तो रद्दबातल समजण्यात येईल. तसेच उमेदवाराने फलकावर स्वतःचे नावे खरेदी केलेलाच अर्ज भरुन पाठवावा. दुस-या उमेदवारांच्या नावे खरेदी केलेला अर्ज भरुन पाठविल्यास तो रद्दबातल समजण्यात येईल.

**८. सदरहू परीक्षा खालील आठ केंद्रांवर घेण्यात येईल.**

परीक्षा केंद्र व केंद्र संकेतांक खालील प्रमाणे आहेत.

| अनु क्र. | परीक्षा केंद्र | केंद्र संकेतांक | अनु क्र. | परीक्षा केंद्र | केंद्र संकेतांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | अमरावती | १४ | ५ | नागपूर | ३२ |
| २ | औरंगाबाद | १५ | ६ | नांदेड | ३३ |
| ३ | मुंबई (मध्य) | ३० | ७ | नाशिक | ३५ |
| ४ | मुंबई (पश्चिम) | ३१ | ८ | पुणे | ३८ |

टीप :- १) जर एखादे केंद्र कार्यन्वित होऊ शकले नाही तर त्या केंद्रातील उमेदवारांची व्यवस्था जवळच्या दुस-या केंद्रावर करण्यात येईल.

२) अर्जात एकदा नमूद केलेल्या केंद्र संकेतांकानुसार प्रवेश दिल्यावर त्यात बदल करण्याची विनंती कोणत्याही परिस्थितीत मान्य करण्यात येणार नाही.

**९.** परीक्षेचे शुल्क रुपये १५०/- (रुपये ८०/- मागासवर्गीयांसाठी) कोर्ट फी स्टॅम्पच्या स्वरुपात अर्जावर पृष्ठ ३ वर दाखविलेल्या ठिकाणीच घट्ट चिकटवावे. कोर्ट फी स्टॅम्प घट्ट चिकटविलेले नसल्यास गहाळ झाले तर अर्ज विनाशुल्क म्हणून नाकारला जाईल. उमेदवारांनी एकदा भरलेले परीक्षा शुल्क कोणत्याही कारणास्तव परत केले जाणार नाही.

**१०. सदोष अर्ज :-**

खाली नमूद केलेले सदोष अर्ज नाकारले जातील व त्याबाबत आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

१) अर्ज आयोगाने पुरविलेल्या विहित नमुन्यात नसल्यास.

२) अर्जावर स्वतःचे छायाचित्र चिकटविलेले नसल्यास.

३) अपूर्ण किंवा चूकीची माहिती भरलेले अर्ज.

४) मराठी व इंग्रजी स्वाक्षरी नसलेले अर्ज.

५) आवश्यक रकमेचे परीक्षा शुल्क न जोडलेले,कोर्ट फी स्टॅम्प ऐवजी अन्य प्रकारचे शुल्क लावलेले __________ अर्ज.

६) अर्जातील प्रमाणपत्र विहित अधिका-यांकडून प्रमाणित नसलेले अर्ज.

७) परीक्षा केंद्राचा संकेतांक नसलेले वा चुकीचा संकेतांक नमूद केलेले अर्ज.

टीप :- नाकारण्यात आलेल्या अर्जाच्या संदर्भात संबंधित उमेदवारांची यादी, त्यांचे अर्ज नाकारल्याच्या कारणांसह पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे सदर उमेदवारांना कळविण्यासाठी पाठविण्यात येईल. एकदा फेटाळण्यात आलेल्या अर्जाचा कोणत्याही परिस्थितीत फेरविचार केला जाणार नाही व त्या संदर्भातील कोणत्याही पत्रव्यहाराची दखल घेतली जाणार नाही.

**११. परीक्षेतील गैरप्रकार करणा-यांना इशारा :-** आयोगातर्फे घेण्यात येणा-या परीक्षेत कोणत्याही प्रकाराचा गैरप्रकार करणे, जसे प्रश्नपत्रिका फोडणे ,बनावट प्रश्नपत्रिकांची विक्री करणे अथवा परीक्षेत अनधिकृत साहित्याआधारे नक्कल करणे, दुस-या उमेदवारांकडून मदत घेणे इत्यादी, दुस-या उमेदवारास मदत करणे,तसा प्रयत्न करणा-या उमेदवारावर तसेच उमेदवार नसलेल्या पण गैरप्रकार करणा-या व्यक्तींवर महाराष्ट्र प्रिव्हेंन्शन ऑफ मालप्रॅक्टीसेस ॲट युनिर्व्हसिटी, बोर्ड ॲन्ड अदर्स स्पेसिफाईड एक्झामिनेशन्स ॲक्ट, १९८२ खाली कारवाई करण्यात येईल. त्याव्यतिरिक्त संबंधित उमेदवारास सदर परीक्षेसाठी अथवा आयोगामार्फत घेण्यात येणा-या सर्व परीक्षा व निवडीसाठी कायमस्वरुपी प्रतिरोधित (Debar) सुध्दा करण्यात येईल, याचीही उमेदवारांनी नोंद घ्यावी.

१२. उमेदवारांना इशारा देण्यात येतो की, जर त्यांनी हेतुपुरस्सर खोटी माहिती देणे किंवा खरी माहिती दडवून ठेवणे किंवा त्यात बदल करणे किंवा पाठविलेल्या दाखल्याच्या प्रतीतील नोंदीत अनधिकृतपणे खाडाखोड करणे किंवा खाडाखोड केलेले वा बनावट दाखले सादर करणे, आयोगाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन न करणे, परीक्षाकक्षातील गैरवर्तन ,परीक्षेच्या वेळी नक्कल करणे, वशिला लावण्याचा प्रयत्न करणे यासारखे कोणतेही गैरप्रकार करणा-या उमेदवारांना गुण कमी करणे, विशिष्ट किंवा सर्व परीक्षांना वा निवडींना अनर्ह ठरविणे, काळया यादीत समाविष्ट करणे, यापैकी प्रकरणपरत्वे योग्य शिक्षा करण्याचा अधिकार आयोगाला राहील. तसेच या संदर्भात शासकीय सेवेतून बडतर्फे करणे ही शिक्षा देण्याचा अधिकार शासनास राहील.

१३. (१) ज्या उमेदवारांचे अर्ज परिपूर्ण असून विभाग प्रमुखांच्या प्रमाणपत्रांसह आवश्यक परीक्षा - शुल्क पाठविलेले आहे, त्यांना त्यांची प्रवेशासाठीची पात्रता न तपासता परीक्षेस प्रवेश दिला जाईल. त्यांचा परीक्षेतील प्रवेश तात्पुरताच राहील आणि त्याने अर्जात दिलेली माहिती ही खोटी वा चुकीची

दिल्यामुळे किंवा पात्रतेच्या अटी पूर्ण करु शकत नसल्याचे या अर्हताप्राप्त ठरत नसल्याचे कोणत्याही टप्प्यावर, कोणत्याही वेळी आढळून आल्यास या परीक्षेतील त्यांची उमेदवारी रद्द केली जाईल, याबाबत आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

(२) आयोगाकडून परीक्षेला प्रवेश देण्यात आलेल्या उमेदवारांना परीक्षेची तारीख, वेळ व ठिकाण नमूद केलेली प्रवेशपत्रे जून, २००३ मधील पहिल्या सप्ताहापर्यंत आयोगाकडून गृह विभागामार्फत पाठविण्यात येतील. प्रवेशपत्रे पोलीस महासंचालक, पोलीस आयुक्त तसेच घटक कार्यालये यांच्याकडून उमेदवारांना वितरीत केली जातील. सर्व उमेदवारांना प्रवेशपत्रे परीक्षेपूर्वी पुरेसा अवधी ठेवून पोचविण्याची जबाबदारी पोलीस मुख्यालय व घटक कार्यालयांची राहील.

(३) ज्या उमेदवारांचे अर्ज विभागामार्फत आयोगाला सादर केले आहेत, अशा उमेदवारांपैकी एखाद्या उमेदवाराला आयोगाने प्रवेश नाकारला असेल तर त्याबाबतचे कारण गृह विभागामार्फत कार्यालय प्रमुखांना कळविण्यात येईल. परीक्षेसाठी प्रवेश अथवा परीक्षेच्या निकालासंबंधात उमेदवाराने आयोगाकडे परस्पर केलेल्या पत्रव्यवहाराची आयोग दखल घेणार नाही.

(४) उमेदवारांना प्रवेशपत्रे रवाना केल्याबाबत गृह विभागास आयोगाकडून कळविण्यात येईल व त्या अनुषंगाने त्याबाबतची घोषणा परिपत्रकान्वये गृह विभागाकडून संबंधितांच्या निदर्शनास आणून देण्यात येईल.

(५) परीक्षेसाठी निर्धारित केलेल्या वेळेपूर्वी उमेदवारांनी संबंधित परीक्षा केंद्रावर उपस्थित राहणे आवश्यक आहे. विलंबाबाबत कोणत्याही कारणाचा आयोगाकडून विचार केला जाणार नाही व यासंबंधीची जबाबदारी संबंधित उमेदवारांची राहील. तसेच, परीक्षा झाल्यानंतर कोणत्याही प्रकारच्या अभिवेदनाचा आयोगाकडून विचार केला जाणार नाही.

**१४. प्रस्तुत परीक्षा पुढीलप्रमाणे तीन टप्प्यात घेण्यात येईल.**

**(अ) लेखी परीक्षा (३०० गुण):-**

प्रस्तुत परीक्षेसाठी २ (दोन)अनिवार्य प्रश्नपत्रिका असतील. त्यापैकी पेपर क्र.१ (मराठी,इंग्रजी व सामान्य अध्ययन) हा वस्तुनिष्ठ व पेपर क्र.२ (विधी) हा पारंपरिक स्वरुपाचा असेल. प्रस्तुत लेखी परीक्षेचा अभ्यासक्रम उमेदवारांना अर्जासोबत पुरविला जाईल.

२(१). उमेदवारांच्या पेपर १ च्या वस्तुनिष्ठ स्वरुपाच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना त्यांनी उत्तरपत्रिकेत नमूद केलेल्या योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. त्या प्राप्त गुणांमधून चुकीची उत्तरे नमूद केल्याबद्दल गुण वजा केले जाणार नाहीत.

(२). एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर लिहिल्यास अथवा कोणत्याही प्रकारचा बदल केल्यास त्याचे गुण वजा करण्यात येतील.

३. प्रस्तुत लेखी परीक्षा परिच्छेद ८ मध्ये नमूद केलेल्या केंद्रांवर घेण्यात येईल . मात्र शारीरिक चाचणी व ' मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी ' ह्या औरंगाबाद, मुंबई, नागपूर व पुणे या चार

केंद्रांवर घेण्यात येतील. सदरहू लेखी परीक्षेसाठी, शारीरिक चाचणीसाठी तसेच मौखिक व व्यक्तिमत्व चाचणीसाठी उमेदवारांना स्वखर्चाने हजर रहावे लागेल.

४. उपरोक्त लेखी परीक्षेचा निकाल तयार करताना सर्व उमेदवारांकरिता लेखी परीक्षेच्या एका अगर अनेक किंवा सर्व विषयां / प्रश्नपत्रिकांसाठी वेगवेगळे किंवा एकत्रित गुणांचे अर्हतामान ठरविण्यात येईल. आवश्यकता भासल्यास, प्रत्येक सामाजिक प्रवर्गासाठी अथवा त्या प्रवर्गातील प्रत्येक उपवर्गासाठी वेगवेगळे अर्हतामान निश्चित करण्यात येईल. असे अर्हतामान हे अधिसूचित पदसंख्येच्या सुमारे ४ पट उमेदवार शारीरिक चाचणीसाठी उपलब्ध होतील या दृष्टीने ठरविण्यात येईल.

**(ब) शारीरिक चाचणी (१०० गुण):-** (१) आयोगाने प्रस्तुत लेखी परीक्षेसाठी निर्धारित केलेल्या अर्हतामानाइतके किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या आणि प्रस्तुत परिपत्रकातील अर्हता,अटी व शर्ती यांची पूर्तता करणा-या उमेदवारांनाच शारीरिक चाचणीसाठी बोलविण्यात येईल. प्रस्तुत चाचणीमध्ये पुरुषांसाठी तसेच महिलांसाठी खालील वेगवेगळया बाबींचा समावेश असेल. सदरहू शारीरिक चाचणी उत्तीर्ण होण्यासाठी उमेदवाराने किमान ३० गुण मिळविणे आवश्यक राहिल. प्रस्तुत चाचणीचा स्तर तपशील उमेदवारांना सदरच्या चाचणीसाठी बोलविण्याच्या पत्रासोबत पुरविण्यात येईल.

(२) लेखी परीक्षेमध्ये अर्हताप्राप्त झालेल्या उमेदवारांना व्यक्तिगतरित्या स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. सदर परिपत्रकास अनुसरून उमेदवाराने आयोगाकडे सादर केलेला मूळ अर्ज तसेच, मुलाखतीच्या वेळी उमेदवारांकडून सादर करण्यात येणारी माहिती व कागदपत्रे यातील तपशील एकच असणे आवश्यक आहे. अन्यथा संबंधित उमेदवाराची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल, याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.

**(क) मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी (५० गुण) :-**

**(१) पुरुषांसाठी शारीरिक चाचणी -**

| अनु क्र. | बाबी | गुण |
|---|---|---|
| १ | गोळाफेक (७.२६० कि.ग्रॅ.) | १५ गुण |
| २ | पुलअप्स | २० गुण |
| ३ | लांब उडी | १५ गुण |
| ४ | धावणे (८०० मीटर्स) | ५० गुण |
| | एकूण | १०० गुण |

[महिलांसाठी शारीरिक चाचणीबाबतचा तक्ता शेवटी जोडला आहे.]

उपरोक्त शारीरिक चाचणीमध्ये उत्तीर्ण होणा-या उमेदवारांचीच मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी **औरंगाबाद, मुंबई, नागपूर व पुणे** अशा चार जिल्हाकेंद्रांवर घेण्यात येईल. सदर चाचणीचा हेतू उमेदवारांची पोलीस उपनिरीक्षक पदावरील नियुक्तीसाठीची योग्यता तपासणे असा असेल. यामध्ये बौध्दिक, सामाजिक, नैतिक गुण- वैशिष्टयांचा तसेच चिकित्सक वृत्तीने एखादा विषय ग्रहण करण्याची क्षमता, तर्कसंगत व सुस्पष्ट विचार मांडण्याची क्षमता, समतोल निर्णय घेण्याची क्षमता या क्षमतांचा देखील समावेश असेल. उमेदवाराला विविध विषयांमध्ये किती रस आहे व त्याने ते विषय किती सखोलतेने आत्मसात केले आहेत, खेरीज उमेदवाराला भारतातील व भारताबाहेरील विविध घडामोडी-बाबत कितपत आस्था आहे, हे सुध्दा जाणून घेण्याचा प्रयत्न प्रस्तुत चाचणीमध्ये केला जाईल. उमेदवाराचा सर्वसामान्य कल, शरीरयष्टी व

व्यक्तिमत्व, चाकोरीबाहेरील जीवनविषयीची आस्था, नेतृत्व-गुण या बाबीदेखील प्रस्तुत चाचणीमध्ये विशेष करुन पारखण्यात येतील.

१५. **अंतिम निकाल :-** (१) अंतिम निकाल तयार करताना प्रस्तुत परीक्षेच्या प्रत्येक उमेदवाराने लेखी परीक्षा, शारीरिक चाचणी आणि मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी या तिन्ही चाचण्यांमध्ये प्राप्त केलेल्या गुणांची बेरीज करुन सदर पदासाठी सर्व सामाजिक वर्गांमधील उमेदवारांसाठी एकच अर्हतामान ठरविण्यात येईल. आवश्यकता भासल्यास, प्रत्येक सामाजिक प्रवर्गासाठी अथवा त्या प्रवर्गांवरील प्रत्येक उपवर्गासाठी वेगवेगळे अर्हतामान विहित करण्यात येईल. अशा प्रकारे विहित केलेल्या अर्हतामानाआधारे तयार करण्यात आलेल्या गुणवत्ता यादीतील समान गुण मिळविणा-या उमेदवारांचा गुणवत्ताक्रम खालील निकषांआधारे ठरविण्यात येईल.

१) अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास उमेदवार धारण करीत असलेली उच्च शैक्षणिक अर्हता. (त्यामध्ये विद्यावाचस्पती (Doctorate), संशोधन पदव्युत्तर पदवी अशा क्रमाने )
२) उच्च शैक्षणिक अर्हतेमधील श्रेणी.
३) उच्च शैक्षणिक अर्हता धारण करण्यास केलेल्या प्रयत्नांची संख्या. (अटेम्प्ट)
४) अंतिम दिनांकास धारण करीत असलेला विहित अनुभवाचा कालावधी .
५) वय (वयाने मोठा असलेल्या उमेदवारांस प्राधान्य)
६) वरील निकष लावूनही उमेदवारांचा गुणवत्ताक्रम समान येत असल्यास अशा उमेदवारांचा गुणवत्ताक्रम त्यांच्या आडनावाच्या आद्याक्षरानुसार लावण्यात येईल. तद्नंतर अधिसूचित पदसंख्या व राखीव जागा यांच्या अधीन राहून अंतिम निकालातील गुणवत्ताक्रमानुसार लेखी परीक्षेच्या निकालाच्यावेळी उपलब्ध पदसंख्येइतक्या उमेदवारांची शिफारस शासनास करण्यात येईल.

(२) सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांच्या बाबतीत ते लेखी परीक्षेमध्ये केवळ त्यांच्यासाठी विहित केलेल्या निम्न अर्हतामानानुसार अर्हताप्राप्त झाल्यास अंतिम शिफारशींच्या / निकालाच्या वेळी त्यांची उमेदवारी सर्वसाधारण पदासाठी विचारात घेतली जाणार नाही.

(३) प्रस्तुत परीक्षेस बसलेल्या सर्व उमेदवारांना त्यांना लेखी परीक्षा, तसेच शारीरिक चाचणी आणि मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी यात मिळालेले गुण स्वतंत्रपणे पाठविण्यात येतील.

१६. या परीक्षेत उमेदवारांना मिळालेल्या गुणांची फेरतपासणी करता येईल. निकालाच्या दिनांकापासून/ गुणपत्रिका निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत एका साध्या कागदावर ज्या प्रश्नपत्रिकेसंदर्भात गुणांची फेरतपासणी करावयाची आहे, ती बाब नमूद करुन प्रत्येक प्रश्नपत्रिकेमधील गुणांच्या फेरतपासणीकरिता रुपये ५०/- प्रमाणे कोर्ट फी स्टॅम्प लावून अर्ज आयोगाकडे "सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया इमारत, तिसरा मजला, महात्मा गांधी मार्ग, मुंबई- ४००००१" या पत्त्यावर परस्पर पाठवावे.

१७. आयोगाने शिफारसपात्र ठरविलेल्या प्रत्येक उमेदवाराला संबंधित प्रशिक्षणासाठी प्रवेश वा उपरोक्त पदावर नियुक्ती मिळेलच असे नाही. आयोग पुरस्कृत उमेदवार सदर पदाच्या प्रशिक्षणासाठी सर्व दृष्ट्या योग्य आहे अशी शासनाची खात्री झाल्याखेरीज तसेच शासनाशी आवश्यक ते सर्व करार केल्याखेरीज संबंधितास प्रशिक्षणासाठी पाठविले जाणार नाही.

१८. " पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य "हे आयोग पुरस्कृत पात्र उमेदवारांना आवश्यक त्या प्रशिक्षणासाठी पाठविण्याचे आदेश काढतील.

१९. संबंधित प्रशिक्षणाची अंतिम परीक्षा उत्तीर्ण होऊन ते प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांना सदर विभागीय स्पर्धा परीक्षेतील गुणवत्ताक्रमानुसार "पोलीस उपनिरीक्षक" या पदावर महाराष्ट्रात कुठेही नियुक्ती देण्यात येईल. या नियुक्तीस शासन सेवेच्या सर्व अटी व शर्ती लागू असतील व नियुक्तिनंतर त्यांना सर्व आवश्यक प्रशिक्षण पूर्ण करावे लागेल.

२०. महाराष्ट्र नागरी सेवा ( संगणक हाताळणी/ वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम, १९९९ च्या अनुषंगाने शासनाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण - २००० / प्र.क्र. ६१/ २००१ / ३९, दिनांक ७ ऑगस्ट, २००१ व शासन निर्णय क्र. प्रशिक्षण - २०००/ प्र.क्र.५ / २००१ / ३९, दिनांक २० जुलै, २००२ नुसार संगणकाच्या ज्ञानासंबंधी D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत "C.C.C." किंवा "O" स्तर किंवा "A" स्तर किंवा "B" किंवा "C" स्तरापैकी कोणतीही एक परीक्षा किंवा महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र दिनांक १९ जुलै, २००३ पर्यंत उमेदवारांनी सादर करणे आवश्यक राहील.

२१. पोलीस विभागाने प्रस्तुत परिपत्रक सर्व संबंधितांच्या (रजेवर/ प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह) प्रकर्षाने निदर्शनास आणावे.

२२. आयोगाचे अध्यक्ष, सदस्य व अधिकारी / कर्मचारी यांच्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरित्या दबाव आणण्याचा अथवा त्यांना वशिला लावण्याचा प्रयत्न करणा-या उमेदवारास अनर्ह ठरविण्यात येईल.

-----------------------

परिच्छेद १४ (ब) (१) खाली वाचावे

| (२)महिलांसाठी शारीरिक चाचणी - | | |
|---|---|---|
| अनु क्र. | चाचणी | गुण |
| १ | गोळाफेक (४ कि. ग्रॅ.) | २० गुण |
| २ | धावणे (२०० मीटर्स) | ४० गुण |
| ३ | चालणे (३ कि.मी.) | ४० गुण |
| | एकूण | १०० गुण |